स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठात डॉ.शंकरराव चव्हाण अभ्यासिका संकुलाच्या बांधकामास निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एसआरटी -२०२०/प्र.क्र.३५/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई -४०० ०३२.
दिनांक : २४ मार्च, २०२२.

**पहा** :- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२२.०१.२०२०.
२. शासन निर्णय क्रमांक: एसआरटी -२०२०/प्र.क्र.३५/विशि-२, दि.२८.०२.२०२०.
३. शासन निर्णय क्रमांक: एसआरटी -२०२०/प्र.क्र.३५/विशि-२, दि.२६.०३.२०२१.
४. कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, यांचे दि.०२.०२.२०२२ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना** :

जलक्रांतीचे जनक माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकररावजी चव्हाण यांचा दि.१४.०७.१९२० हा जन्मदिवस असल्याने, दि.१५.०७.२०१९ ते दि.१४.०७.२०२० पर्यंत त्यांचे जन्मशताब्दी वर्ष हे विविध कार्यक्रमाच्या माध्यमातून साजरे करुन त्यांच्या कार्याला उजाळा देण्याबाबत संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार स्वर्गीय शंकररावजी चव्हाण, माजी मुख्यमंत्री यांच्या जन्मशताब्दी प्रित्यर्थ विविध कार्यक्रम राबविण्याकरिता संबंधित प्रशासकीय विभागानी विविध कार्यक्रम हाती घेण्याचे प्रस्तावित केले होते. त्यामध्ये उच्च व तंत्र शिक्षण विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत "माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या स्मरणार्थ नांदेड शहरात ग्रंथालय, स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र त्याचप्रमाणे मुला-मुलींचे वसतिगृह उभारणे," हे काम हाती घेण्याबाबत प्रस्तावित करण्यात आले होते. तद्नुषंगाने स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठाच्या आवारामध्ये डॉ.शंकरराव चव्हाण अभ्यासिका संकुलाच्या बांधकामास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय सदर बांधकामास रु.२,६२,००,०००/- इतका निधी वितरीत केला आहे. आता उर्वरित निधी वितरीत करण्याकरीता संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये विद्यापीठाने विनंती केली आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने उर्वरित निधी उपलब्ध करुन देण्याची शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड या विद्यापीठाच्या आवारात डॉ.शंकरराव चव्हाण अभ्यासिका संकुलाच्या बांधकामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती विचारात घेता, सदर बांधकामाकरीता सुधारीत अंदाजात उपलब्ध झालेल्या निधीतून रु.४,८३,००,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी त्र्याऐंशी हजार फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू मंजूर झालेला निधी स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता संबंधीत विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. संबंधीत विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilisation Certificate) तसेच विद्यापीठाने केलेल्या बांधकामाची सद्य:स्थिती संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास तात्काळ सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. या कामासाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (१९) स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांचा विकास (कार्यक्रम) (२२०२ ३५४८) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा. तसेच वरील अटींचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांची राहील.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२१, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१ अन्वये विभागास अधिकार प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२३/२०२२/व्यय-५, दि.१५.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०३२४१५१५५९६८०८ असा आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2022.03.24 15:16:44 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र राज्य**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) कुलगुरु, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे. (५ प्रती)
४) सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड विभाग, नांदेड.
५) कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड विभाग, नांदेड.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे /नांदेड.
१०) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, उपरोक्त वितरीत करण्यात आलेला निधी तात्काळ BMS प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात यावा.
१६) निवड नस्ती (विशि -२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.